**शिक्षणशुल्क समितीच्या अशासकीय सदस्यांना प्रवासभत्ता / बैठकभत्त्याऐवजी मानधन मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शुल्क ५२१८/प्र.क्र.३३४/मशि-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ एप्रिल, २०२३

वाचा :-

शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र. शुल्क २०१५/प्र.क्र.४३४/१५/मशि-२, दि. १९.१.२०१६

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भाधीन येथील आदेशान्वये राज्यातील विनाअनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षणशास्त्र व शारीरिक शिक्षण महाविद्यालयांचे शिक्षण शुल्क निर्धारीत करण्यासाठी समिती गठीत करण्यात आलेली आहे. या समितीवरील अशासकीय सदस्यांना मानधन मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील विना अनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र व शारीरिक शिक्षण महाविद्यालयांचे शिक्षण शुल्क निर्धारीत करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीवर अशासकीय सदस्य नियुक्त केले जातात. सदर अशासकीय सदस्य त्यांचे दैनंदीन कामकाज सोडून समितीच्या बैठकांना उपस्थित राहतात. ही बाब विचारात घेऊन त्या अशासकीय सदस्यांना प्रवासभत्ता / बैठकभत्ता देण्याऐवजी प्रतिबैठक रुपये ५,०००/- (अक्षरी रुपये पाच हजार) एवढे मानधन अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च “मागणी क्र.डब्ल्यु-२ २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ००१- संचालन व प्रशासन, (००)(०३) विनाअनुदानित व कायमस्वरुपी विना अनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयाकडून आकारण्यात येणाऱ्या फीचे निश्चितीकरण करण्यासाठी समिती स्थापन करणे (कार्यक्रम) (२२०२ आय ०२२),२८ व्यावसायिक सेवा” या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२०८/व्यय-५ दि. २.३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१११६५३१०९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.04.11 17:01:32 +05'30'

**(प्रताप पां.लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

४. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण,याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

७. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

९. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१२. सह संचालक, शिक्षण शुल्क समिती, मुंबई

१३. सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण

१४. सर्व अकृषि विद्यापीठांचे कुलसचिव,

१५. सर्व प्राचार्य, शिक्षणशास्त्र महाविद्यालय / शारीरिक शिक्षण महाविद्यालय (संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे मार्फत)

१६. शिक्षण शुल्क समितीचे सर्व पदसिध्द व नामनिर्देशित सदस्य (संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे मार्फत)

१७. मान्यताप्राप्त कायम विनाअनुदानित महाविद्यालये संघटना (शिक्षणशास्त्र व शारीरिक शिक्षण शास्त्र) (संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे मार्फत)

१८. अवर सचिव, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१९. निवड नस्ती (मशि-२).